**मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्व्हिसेस लि. मुबई यांनी दाखल केलेली याचिका क्र. ९४३४/२०१५ (एसटी) मध्ये शासनाची बाजु मांडण्यासाठी श्री. कुंभकोणी, विशेष सरकारी वकील यांना व्यावसायिक फि मंजुर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ३६१५/ प्र क्र ११०/भाग-१/ पोल-३**

२ रा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०५ जून, २०१५.

**वाचा :** १) विधि व न्याय विभागाचे पत्र क्र. ३६०-२०१५/ई, दि. १५.४.२०१५.

२) पोलीस उप आयुक्त (मुख्यालय), पोलीस आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र. कक्ष-१०/ सिंहस्थ शाखा/ सीसीटीव्ही यंत्रणा/४०२/२०१५, दि. १७.४.२०१५.

**शासन निर्णय :**

नाशिक-त्र्यंबकेश्वर येथे कुंभमेळा कालावधीत तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावरील सीसीटीव्ही यंत्रणे संदर्भात मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्व्हिसेस प्रा. लि. , मुंबई यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. ९४३४/२०१५ (एसटी) दाखल केली होती. नाशिक येथील सिंहस्थ कुंभमेळयाचे काम प्रगतीपथावर असून सदर बाब संवेदनशील असल्यामुळे या संदर्भात मा. उच्च न्यायालयात दाखल झालेल्या रिट याचिकांमध्ये लवकरात लवकर निर्णय होणे आवश्यक असल्यामुळे शासनाची बाजू सक्षमपणे मांडण्यासाठी श्री. कुंभकोणी, विशेष सरकारी वकील यांची विधि व न्याय विभागाच्या दि.१५.४.२०१५ रोजीच्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आली.

श्री. कुंभकोणी, विशेष सरकारी वकील यांना मा. उच्च न्यायालयातील उपस्थितीबाबतची व्यावसायिक फी रु. ७५,०००/- , तीनदा झालेली विचारविनिमय फी रु. ३०,०००/- व प्रारुप व शपथपत्र दाखल करणे इ. बाबतची फी रु. ३५,०००/- अशी एकुण रु. १,४०,०००/- (अक्षरी रु. एक लाख चाळीस हजार फक्त) एवढी फी अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

श्री. कुंभकोणी, विशेष सरकारी वकील यांची फी अदा करण्यासाठी रु. १,४०,०००/- इतका खर्च पोलीस महासंचालक यांच्या अधिनस्थ “२०५५-पोलीस , १०९- जिल्हा पोलीस (००) (०१), जिल्हा पोलीस बल (२०५५ ०१६८) या लेखाशिर्षाखाली २८-व्यावसायिक सेवा” या उद्दिष्टाअंतर्गत खर्ची टाकुन तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन मधील अ.क्र. ४ समोरील नियम क्र. २७ (२) अनुसार प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्राप्त झालेल्या अधिकारास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६११४४२५१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.06.06 11:55:09 +05'30'

(द. ह. कदम)

कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

यांना विनंती करण्यात येते की, विशेष सरकारी वकील श्री. आशुतोष कुंभकोणी यांना व्यावसायिक फि अदा करण्याची कार्यवाही करावी. (सोबत देयकाची मुळ प्रत जोडली आहे.)

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५) पोलीस आयुक्त, नाशिक शहर
६) अवर सचिव (विधि), ई-शाखा, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) श्री. आशुतोष कुंभकोणी, विशेष सरकारी वकील, ए-१, जीवन ज्योत बिझनेस प्रिमायसेस, १८/२०, कावसजी पटेल स्ट्रीट, फोर्ट, मुंबई-०१.
८) निवडनस्ती/ पोल-३.